विशेष केंद्रीय सहाय्य २०१३-१४-
अवितरीत निधी वितरणास मान्यता
देण्याबाबत.
Releasing unspent Grants
under Special central
Assistance to TSP-2013-14

# महाराष्ट्र शासन
## आदिवासी विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः विकेंस-२०१४/प्र.क्र.६४/का.-१९

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीखः १२/०३/२०१५

वाचा -

१) शासन निर्णय आदिवासी विकास विभाग क्रमांकः विकेंस-२०१३/प्र.क्र.१६१/का-१९, दिनांक २५/११/२०१३ व दि.२०.०३.२०१४.

२) केंद्र शासनाचे पत्र क्र.F.No.११०१५/०३(१३)/२०१४-SG-II Dt.०९/०२/२०१५

प्रस्तावना (Preamble) -

राज्य शासनाच्या दिनांक १७ एप्रिल, २०१३ च्या प्रस्तावास अनुसरुन केंद्र शासनाने विशेष केंद्रिय सहाय्य (SCA to TSP) या योजनेखाली सन २०१३-१४ या आर्थिक वर्षात एकूण रू.७७२८.०० लक्ष निधी योजनानिहाय राज्य शासनास वितरीत केलेला आहे.यापैकी सन २०१३-१४ या वर्षात या योजनेखाली रू.७७२८.०० लक्ष निधी वितरणाचे आदेश संदर्भीय शासन निर्णयान्वये निर्गमित करण्यात आलेले आहेत. तथापी, अर्थसंकल्पिय तरतूदींच्या अभावामुळे रु.७६६६.४६ लक्ष निधी आयुक्त,आदिवासी विकास नाशिक यांना खर्चासाठी आहरित करता येणे शक्य झाले आहे. उर्वरित अवितरीत रु.६१.५४ लक्ष निधी सन २०१४-१५ या वर्षात खर्च करण्यास केंद्र शासनाने संदर्भ क्र.२ च्या पत्रान्वये मान्यता दिली असल्याने केंद्र शासनाने मंजूर केलेले सदर अनुदान ते ज्या कामांकरिता मंजूर करण्यात आले आहे, त्याच कामांसाठी खर्चा करिता आयुक्त,आदिवासी विकास यांना खर्चासाठी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाचे विचाराधीन होती.

शासन निर्णय (Resolution)-

शासन आता या निर्णयाद्वारे केंद्र शासनाने आदिवासी उपयोजनेस विशेष केंद्रिय सहाय्य(SCA to TSP ) या कार्यक्रमाखाली सन २०१३-१४ करिता मंजूर एकूण रु.७७२८.०० लक्ष निधीपैकी अवितरीत रु.६१.५४ लक्ष (अक्षरी रुपये एकसष्ट लक्ष चौपन्न हजार फक्त) खालील तालिकेत स्तंभ क्र.४ मध्ये दर्शविलेल्या योजनांवर खर्च करण्यास याद्वारे शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| Sr. No. | Activities/Schemes | Amount approved (Rs. lakh) | Amount released earlier (Rs. lakh) | Proposed released (Rs. lakh) |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | SCA to TSP | ७७२८.०० | ७६६६.४६ | ६१.५४ |

उपरोक्त रु.६१.५४ लक्षचा खर्च मागणी क्र.टी-५, मुख्य लेखाशीर्ष २२२५- अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीयांचे कल्याण - पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - ०२ - अनुसूचित जमातीचे कल्याण - ७९६- जनजाती क्षेत्र उपयोजना (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना - राज्य योजनांतर्गत योजना, विशेष केंद्रीय सहाय्य योजना (०१) (४१) केंद्रीय सहाय्याची एकात्मिक योजना, ३१ सहायक अनुदाने (२२२५ ३५५६) (वेतनेतर) यामधील सन २०१४-१५ मध्ये अर्थसंकल्पित असलेल्या निधीतून करण्यात यावा.-

सदर निधी अर्थसंकल्पिय अंदाज वितरण व संनियंत्रण प्रणालीद्वारे वितरीत करण्यात आलेला आहे. वितरीत निधीच्या मर्यादेत निधी आहरीत करण्याची दक्षता आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक यांनी घ्यावी. उपरोक्त मंजूर करण्यात आलेले अनुदान ते ज्या बाबींसाठी खर्च करण्यास मंजूरी देण्यात आलेली आहे, त्याच बाबींसाठी खर्च करावे व त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र आर्थिक व भौतिक अहवालासह शासनास सादर करण्याची दक्षता घ्यावी.

**सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ४८/व्यय-१४, दिनांक २०/०२/२०१५ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.**

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३१२१७३२५४९८२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Manojkumar Gorakh Mahale

Digitally signed by Manojkumar Gorakh Mahale
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Manojkumar Gorakh Mahale
Date: 2015.03.12 17:42:45 +05'30'

**( मनोजकुमार महाले )**
कार्यासन अधिकारी

प्रत,

१. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
३. अवर सचिव, भारत सरकार, जनजाती कार्य मंत्रालय, शास्त्री भवन, नवी दिल्ली.

४. खाजगी सचिव, मा. मंत्री, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.

५. खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.

६. मा. प्रधान सचिव, आदिवासी विकास यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

७. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक

८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी

९. सह सचिव, आदिवासी विकास, मंत्रालय, मुंबई.

१०. कार्यासन अधिकारी, का-६ आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

११. संगणक समन्वयक, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

१२. निवड नस्ती (का.१९) आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.